राज्यात करोना विषाणू (COVID-१९)चा प्रादुर्भाव रोखण्यासाठी शासन व खाजगी वैद्यकीय व्यावसायिक यांचे समन्वयास्तव समिती गठीत करणेबाबत

महाराष्ट्र शासन

सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** करोना-२०२०/प्र क्र ५८/ आरोग्य ५,

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,

संकुल इमारत, ८ व १० मजला, नवीन मंत्रालय,

मुंबई- ४०० ००१.

दिनांक : १४ मे,२०२०

प्रस्तावना :

जगभरात सर्वत्र पसरत असलेला नविन करोना विषाणूचा प्रादुर्भाव व त्याच्या संसर्गाने बाधित होणाऱ्या रुग्णांची संख्या लक्षात घेता, जागतिक आरोग्य संघटनेने आरोग्य विषयक आंतरराष्ट्रीय आपत्ती जाहीर केलेली आहे. या विषाणूचा प्रादुर्भाव रोखणे व प्रतिबंधित उपाययोजना यासाठी जागतिक आरोग्य संघटना व आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचेकडून दैनंदिन स्वरुपात सूचना देण्यात येत आहेत.

महाराष्ट्र राज्यात करोनाबाधित रुग्णांचे प्रमाण वाढत असल्याने आजारास प्रतिबंध व नियंत्रण यासाठी तातडीच्या व आपत्कालीन उपाययोजना सुरु करण्यात आलेल्या आहेत. यात रुग्ण शोध मोहीम, रुग्णांचे विलगीकरण व एकंदरच विषाणू आजार प्रतिबंध व नियंत्रण या बाबी करण्यात येत आहेत. तसेच साथरोग अधिनियम, १८९७ मधील तरतूदी लागू करण्यात आलेल्या आहेत. या परिस्थितीत राज्यातील करोना बाधित रुग्णसंख्या आटोक्यात ठेवणे, प्रादुर्भाव रोखणे व प्रतिबंधात्मक उपाययोजना करणे याचा दैनंदिन आढावा घेण्यात येत आहे. तथापि, वाढती रुग्णसंख्या व भविष्यात उद्भवणारी उद्रेकजन्य परिस्थिती लक्षात घेता, खाजगी वैद्यकीय व्यावसायिक व खाजगी रुग्णालये यांचेकडूनही रुग्णसेवा घेणे अपरिहार्य ठरले आहे. त्यानुसार मा. मुख्य सचिव स्तरावरुन वेळोवेळी आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत.

या पार्श्वभूमीवर मा. मुख्य सचिव यांनी अध्यक्ष व प्रतिनिधी, इंडियन मेडिकल असोसिएशन (महाराष्ट्र राज्य) यांचे समवेत बैठक घेतली. या बैठकीत केंद्र शासनाकडून व राज्य शासनाकडून कोविड-१९ उपचारासंदर्भात पारीत झालेले विविध आदेश, मार्गदर्शक सूचना, अधिसूचना, इ. बाबींवर चर्चा झाली. या बैठकीत इंडियन मेडिकल असोसिएशनचे प्रतिनिधी यांनी कोविड-१९ उपचाराच्या अनुषंगाने खाजगी वैद्यकिय व्यावसायिकांना पीपीई किट उपलब्धतेबाबत येणाऱ्या अडचणी तसेच कोविड-१९ उपचारानंतर सामाजिक स्तरावरुन येणाऱ्या अडचणी या बैठकीत मांडल्या. खाजगी वैद्यकिय व्यावसायिकांना कोविड-१९ उपचारांसाठी

येणाऱ्या अडचणींचे निराकरण करणे व कोविड-१९ च्या उपचारासंदर्भात केंद्र व राज्य शासनाकडून पारीत झालेल्या आदेशांची अंमलबजावणी व सामाजिक सुरक्षा या अनुषंगाने समन्वय राखण्यास्तव राज्यस्तर व जिल्हास्तरावर समिती गठीत करण्याचा निर्णय या बैठकीत घेण्यात आला.

## शासन निर्णय :

करोना विषाणू आजार प्रतिबंध व नियंत्रण या संदर्भात राज्य शासन व खाजगी वैद्यकिय व्यावसायिक रुग्णालये यांचे समन्वयास्तव राज्यस्तरावर तसेच जिल्हास्तरावर समिती गठीत करण्यात येत आहे. सदर समितीची रचना खालीलप्रमाणे राहील:-

राज्यस्तरीय समिती:

| | |
|---|---|
| १) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य | अध्यक्ष |
| २) प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग | सदस्य |
| ३) प्रधान सचिव-२, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ४) सचिव, वैद्यकिय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ५) आयुक्त, मुंबई महानगरपालिका | सदस्य |
| ६) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई | सदस्य |
| ७) संचालक, वैद्यकिय शिक्षण संचालनालय, मुंबई | सदस्य |
| ८) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई | सदस्य सचिव |
| ९) अध्यक्ष, इंडियन मेडिकल असोसिएशन (महाराष्ट्र राज्य) | सदस्य |
| १०) प्रतिनिधी, इंडियन मेडिकल असोसिएशन | आमंत्रित |
| ११) प्रतिनिधी, इंडियन मेडिकल असोसिएशन | आमंत्रित |

जिल्हास्तरीय समिती:

| | |
|---|---|
| १) जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | सदस्य |
| ३) पोलीस आयुक्त (असल्यास) | सदस्य |
| ४) जिल्हा पोलीस अधिक्षक | सदस्य |
| ५) आयुक्त, महानगरपालिका (असल्यास) | सदस्य |
| ६) जिल्हा शल्यचिकित्सक | सदस्य सचिव |
| ७) जिल्हा अध्यक्ष, इंडियन मेडिकल असोसिएशन (महाराष्ट्र राज्य) | सदस्य |
| ८) प्रतिनिधी, इंडियन मेडिकल असोसिएशन | आमंत्रित |

या समितीची उद्दीष्टे व कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहतील.

- राज्यातील करोना विषाणू संसर्ग प्रतिबंधात्मक व नियंत्रणात्मक उपाययोजनांच्याबाबत निर्गमित झालेले विविध शासन निर्णय तसेच औषधोपचाराबाबतचे प्रोटोकॉल सर्व संबंधितांना उपलब्ध करुन देणे.
- खाजगी वैद्यकिय व्यावसायिकांना व त्यांचे रुग्णालयातील कर्मचाऱ्यांना वैयक्तिक सुरक्षा उपकरणे (पीपीई किटस्, ग्लोव्हज्, मास्क) उपलब्ध करुन देण्याबाबत आवश्यक ते शासकीय सहकार्य करणे.
- कोविड-१९ उपचार देणाऱ्या खाजगी वैद्यकिय व्यावसायिक व आरोग्य कर्मचारी यांना सामाजिक सुरक्षा व सौहार्दपूर्ण वागणूक मिळण्यासाठी आवश्यक ती उपाययोजना करणे.
- जागतिक आरोग्य संघटना, आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, भारत सरकार यांचेकडून प्रसारित करण्यात येणाऱ्या विविध उपाययोजनांची राज्यस्तरीय/जिल्हास्तरीय अंमलबजावणी याबाबत शासकीय व खाजगी वैद्यकिय व्यावसायिकांमध्ये समन्वय साधणे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(डॉ. प्रदीप व्यास) 14-5-2020

प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव, (महसूल) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. अप्पर मुख्य सचिव, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अप्पर मुख्य सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग
६. प्रधान सचिव-२, नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सचिव, (मदत व पुर्नवसन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सचिव, वैद्यकिय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
९. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
१०. जिल्हाधिकारी (सर्व)
११. आयुक्त, महानगरपालिका (सर्व)
१२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१३. संचालक, वैद्यकिय शिक्षण संचालनालय, मुंबई

१४. संचालक, आरोग्य सेवा-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई / पुणे
१५. उपसंचालक आरोग्य सेवा (सर्व)
१६. जिल्हा शल्यचिकित्सक (सर्व)
१७. जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व)
१८.अध्यक्ष, इंडियन मेडिकल असोसिएशन (महाराष्ट्र राज्य)
१८. जिल्हा अध्यक्ष, इंडियन मेडिकल असोसिएशन (सर्व)

प्रत माहितीस्तव

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा .उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. अपर मुख्य सचिव ,सचिव/प्रधान सचिव/सर्व मंत्रालयीन विभाग मुंबई ,
४. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन मुंबई.
५. मा. मुख्य सचिव यांचे उप सचिव
६. सर्व विभागीय आयुक्त
७. मा. मंत्री (आरोग्य व कुटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मा. राज्यमंत्री (आरोग्य व कुटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
९. सर्व सह सचिव/उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग
१०. निवड नस्ती-आरोग्य ५